राष्ट्रीय बायोगॅस व खत व्यवस्थापन कार्यक्रम योजनेची ऑडिओ जिंगल्सद्वारे प्रसिध्दी बाबत.

**महाराष्ट्र शासन**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र. बिजीएस-२०११/प्र.क्र.७०/यो-६,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :१ डिसेंबर, २०११.

वाचा : - केंद्र शासनाचे नवीन आणि नवीकरणीय मंत्रालयाचे पत्र क्र. ५/५/२००९/बिई दिनांक २७/११/२००९,

<u>प्रस्तावना</u> :

राष्ट्रीय बायोगॅस व खतव्यवस्थापन कार्यक्रम ही १००% केंद्र पुरस्कृत योजना असून, सदर योजना केंद्र शासनाच्या २० कलमी कार्यक्रमाअंतर्गत समाविष्ट आहे. केंद्र शासनाच्या अपांरपारीक उर्जा साधने मंत्रालयाकडून दरवर्षी महाराष्ट्र राज्यासाठी बायोगॅस संयत्राचे उद्दिष्ट ठरवून दिले जाते.

राष्ट्रीय बायोगॅस व खतव्यवस्थापन कार्यक्रम योजनेअंतर्गत केंद्र शासनाच्या संदर्भाधीन दि.२७/९/२००९ च्या पत्रान्वये राष्ट्रीय बायोगॅस व खतव्यवस्थापन कार्यक्रम या योजनेची प्रसिध्दी व जनजागृती करण्यासाठी लागणारा खर्च निश्चित करुन दिलेला आहे. केंद्र शासनाकडून दरवर्षी निश्चित करुन दिलेले उद्दिष्ट पूर्ण करुन या योजनेचा लाभ सर्वसामान्य जनतेपर्यंत पोहचावा यासाठी ग्रामीण भागात योजनेची प्रसिध्दी / जनजागृती होणे आवश्यक असल्याने राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या बस स्थानकांवर ऑडिओ जिंगल्स संदेशाचे प्रसारण करुन जनतेमध्ये प्रबोधन व जनजागृती करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>** प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे राष्ट्रीय बायोगॅस व खत व्यवस्थापन कार्यक्रम या योजनेची Director of Advertising & visual publicity यांनी निश्चित केलेल्या दराने राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या ३५ बस स्थानकांवर प्रपत्र-अ प्रमाणे ऑडिओ जिंगल्स संदेशाचे प्रसारण करुन प्रसिध्दी व जनजागृती करण्यासाठी व्रित्ती सोल्युशन लिमिटेड, पुणे याची खालील अटींच्या अधीन राहून नियुक्ती करण्यात येत असून ऑडिओ

रोटा/एच-२४०६[ ४००-१२-११ ]-१

जिंगल्स प्रसारणासाठी येणारा खर्च रु. ५,००,०००/- (रुपये-पाच लाख मात्र ) एवढे अनुदान कोल्हापूर जिल्हा परिषदेच्या मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद यांच्या ट्रेझरी कोड क्रमांकावर अर्थसंकल्पीय प्रणाली मार्फत (BDS System) वितरीत करण्यात येत आहेत.

अटी व शर्ती :-

१) राष्ट्रीय बायोगॅस व खत व्यवस्थापन कार्यक्रम या योजनेच्या ३० सेकंदाच्या ऑडिओ जिंगल्स / संदेशाचे प्रसारण दिवसातून सकाळी ८ ते सायंकाळी ५ वाजेपर्यंत ९ वेळा करावे.

२) जाहिरात प्रसारणाचा कालावधी ३० दिवसांसाठी असेल.

३) ऑडिओ जिंगल्स प्रसारणाच्या ३० दिवसांचा संगणकीय अहवाल जिल्हा कृषी विकास अधिकारी, कोल्हापूर यांच्याकडे सादर करावा.

४) ऑडिओ जिंगल्स प्रसारणासाठी येणा-या खर्चाची देयके व्रित्ती सोल्युशन लिमिटेड यांच्या नावाने प्रसारणानंतर कृषि विकास अधिकारी, कोल्हापूर यांचेकडून एकरकमी पारित करण्यात येईल.

२. प्रस्तुत खर्च हा "मागणी क्र.एल-३, २८१०, अपारंपारिक उर्जा साधने-०१-बायो एनर्जी १०१, बायोगॅसच्या विकासासाठी राष्ट्रीय कार्यक्रम(०१), पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- केंद्र पुरस्कृत योजना-(०१)(०१) गोबरगॅस संयंत्र बसविणे (२८१० ००१६)- ३३ अर्थसहाय्य" या मुख्यलेखाशिर्षाखाली सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षासाठी मंजूर केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेले अनुदान हे कोषागारातील रोख एकमेद्वारा देय आहे. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे. राष्ट्रीय बायोगॅस विकास कार्यक्रम ही १००% केंद्र पुरस्कृत योजना असून २० कलमी कार्यक्रमाच्या अंमलबजावणीचा घटक असल्याने मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, कोल्हापूर यांनी सदर आदेशानुसार ऑडिओ जिंगल्स संदेशाच्या प्रसारणाची खात्री करुन देयके व्रित्ती सोल्युशन लिमिटेड, पुणे यांना अदा करण्यात यावीत.

४. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाच्या मान्यतेने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.६७१ / अर्थसंकल्प-१७, दि. १४/१०/२०११ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१११२०५०६२१२९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(प्रकाश वळवी)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,
१) विभागीय आयुक्त (सर्व)
२) महालेखापाल महाराष्ट्र-१ मुंबई ( लेखा परिक्षा ) /( लेखा व अनुज्ञेयता ) (जादा ५ प्रतीसह)
३) महालेखापाल महाराष्ट्र-२ नागपूर ( लेखा परिक्षा ) /( लेखा व अनुज्ञेयता ) (जादा ५ प्रतीसह)
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
५) मुख्य लेखा व वित्त अधिकारी , जिल्हा परिषद (कोल्हापूर )
७) कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद ( सर्व)
८) उप मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा ( कोल्हापूर)
९) जिल्हा लेखा परिक्षक स्थानिक निधी लेखा (कोल्हापूर )
१०) संचालक, लेखा कोषागारे, महाराष्ट्र, मुंबई.
११) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१२) नियोजन विभाग, कार्यासन १४४३ /१४४४ , मंत्रालय, मुंबई
१३) वित्त विभाग (व्यय-१५ /अर्थ- १७ ), मंत्रालय, मुंबई
१४) कार्यासन क्रमांक वित्त-१, वित्त-२, वित्त-६, वित्त-७,वित्त-८, योजना-२,योजना-३, योजना-७, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.
१५) निवड नस्ती, कार्यासन योजना-६, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.

| अ.क्र. | जाहिरातीसाठीची स्थळे |
|---|---|
| १ | २ |
| १ | भिवंडी, जि.ठाणे |
| २ | महाड, जि. रायगड |
| ३ | रत्नागिरी सी.बी.एस. |
| ४ | कणकवली, जि.सिंधुदर्ग |
| ५ | पैठण, जि. औरंगाबाद |
| ६ | अंबेजोगाई, जि. बिड |
| ७ | जालनां सी.बी.एस. |
| ८ | लातुर सी.बी.एस. |
| ९ | नांदेड सी.बी.एस. |
| १० | तुळजापूर सी.बी.एस.जि.उस्मानाबाद |
| ११ | परभणी सी.बी.एस. |
| १२ | लोणवळा, जि. पुणे |
| १३ | महाबळेश्वर, जि. सातारा |
| १४ | सांगली सी.बी.एस. |
| १५ | इस्लामपुर, जि. सांगली |
| १६ | इचलकरंजी, जि. कोल्हापूर |
| १७ | पंढरपूर, जि. सोलापूर |
| १८ | अक्कलकोट, जि. सोलापूर |
| १९ | नागपूर जी. पेठ |
| २० | वर्धा सी.बी.एस. |
| २१ | चंद्रपूर सी.बी.एस. |
| २२ | भंडारा सी.बी.एस. |
| २३ | गोंदिया सी.बी.एस. |
| २४ | गडचिरोली सी.बी.एस. |
| २५ | मालेगांव न्यू सी.बी.एस.जि. नाशिक |
| २६ | शिर्डी, जि. अहमदनगर |
| २७ | अंमळनेर, जि. जळगांव |
| २८ | धुळे सी.बी.एस. |
| २९ | नंदूरबार सी.बी.एस. |
| ३० | अमरावती सी.बी.एस. |
| ३१ | अकोला न्यू सी.बी.एस. |
| ३२ | पुसद जि. यवतमाळ |
| ३३ | शेगांव जि. बुलढाणा |
| ३४ | वाशिम |
| ३५ | हिंगोली |

--------